**महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान फलटण शहराच्या मलनिस्सारण प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**नगरविकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-बैठक-२०१७/प्र.क्र.१७२(५)/नवि-३३**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक:- ३० मार्च, २०१७**

**वाचा:**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र: नगरो २०१४/प्र. क्र.११९/नवि-३३, दिनांक २१ ऑगस्ट,२०१४.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.नगरो-२०१५/प्र.क्र.६४/नवि-३३, दिनांक २७ मे, २०१६.
३. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. नगरो - २०१६/ प्र.क्र.३२८/ नवि-३३, दिनांक ४ ऑक्टोबर, २०१६
४. नगरपरिषद प्रशासन संचालनालयाचे क्र.नपप्रसं/नगरोत्थान/२०१६/फलटण भुगयो/सं. १२२३३/का. १३, दिनांक १६ जानेवारी, २०१७ रोजीचे पत्र.
५. दिनांक ३०.०३.२०१७ रोजी झालेल्या महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाखालील प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:**

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयाच्या तरतूदीन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

०२. महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत **फलटण नगरपरिषदेचा मलनिस्सारण प्रकल्प** नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत संदर्भाधीन क्र. ४ च्या पत्रान्वये राज्यस्तरीय मान्यता समितीकडे मान्यतेकरीता सादर करण्यात आला होता. या प्रकल्पास संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे यांनी तांत्रिक सहमती दिलेली आहे. त्या अनुषंगाने राज्यस्तरीयप्रकल्प मान्यता समितीने दि. ३०.०३.२०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये केलेल्या शिफारसीनुसार सदर प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियाना अंतर्गत सादर करण्यात आलेल्या **फलटण नगरपरिषदेच्या मलनिस्सारण** प्रकल्पास संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतुदीच्या व महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक सहमतीच्या अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार

या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. या प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

| Sr. No. | Component | Cost in Rs. |
|---|---|---|
| A | Cost of Sewerage Network for Drainage Zones in STP-१ | |
| १ | Zone XI, III, II, XII & VI-L-३०.९२२ km RCC NP२ १५० TO ६०० mm dia | २१,२९,८७,९१० |
| २ | Rising Mains no २ DIK९ L ३८m ३००mm dia | ३,३८,२४८ |
| ३ | Pumping Station of STP-१ | २२,५५,७४५ |
| ४ | Sewerage Treatment Plant (२.५ MLD) | २,९५,४१,४७९ |
| ५ | Pumping machinery @ PS -१ | ३०,९६,६०५ |
| ६ | Fencing & gate @ Substation at STP-१ | २७,३२९ |
| ७ | DG Set for Electric Substation at STP-१ | ३६,२७,८४० |
| | Total of A | **२५,१८,७५,१५६** |
| B | Cost of Sewerage Network for Drainage Zones in STP-२ | |
| ८ | Zone X,IV,I,V,IX,VII & VIII - L-४४.६२८ km RCC NP २/३-१५० TO ७०० mm dia. | ३८,२०,६१,२५९ |
| ९ | Rising Mains NO २, DIK९ L-२३ m, ४५० mm dia. | १२,५८,७७२ |
| १० | Pumping Station No २ | ३०,४८,६३३ |
| ११ | Rising Main No ३ DIK९ L-२३ m, ४५० mm dia. | ३,३९,१३० |
| १२ | Pumping Station No. ३ | २२,५६,४०९ |
| १३ | Sewerage Treatment Plant (५.५ MLD) | ४,७०,७३,३९९ |
| १४ | Pumping Machinery @ PS-२ | ४५,९९,८६४ |
| १५ | Pumping Machinery @PS-३ | ३३,०७,२६४ |
| १६ | Fencing & gate @ Substation at STP-२ | २७,३२९ |
| १७ | DG Set for Electric Substation at STP-२ | ६४,३३,२०० |
| | Total of B | **४५,०४,०५,२५९** |
| C | Others | |
| १८ | Express Feeder of STP १ & २ | १,८७,८९,००० |
| १९ | Suction cum Jetting Machine | ४३,४०,००० |
| २० | Mobile Flushing Tank | १६,३५,००० |
| | Total of C | **२,४७,६४,०००** |
| | Total of A+B+C | **७२,७०,४४,४१५** |
| | Say in Rs. | ७२.७० Cr. |
| | **प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी** | **कार्यादेश दिनांकापासून २४ महिने** |

०२. सदर प्रकल्पास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून प्राप्त झालेल्या तांत्रिक सहमतीच्या आधारे अंतरिम प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्पासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून अंतिम तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर त्यानुसार सुधारीत प्रशासकीय मान्यता आदेश निर्गमित करण्यात येतील.

०३. **फलटण नगरपरिषदेच्या मलनिस्सारण प्रकल्पाचा** वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील:-

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव व वर्ग | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ८५ %) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या १५ %) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | फलटण नगरपरिषद (ब वर्ग) | रु. ७२.७० कोटी | रु. ६१.७९५ कोटी | रु. १०.९०५ कोटी |

०४. संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार **फलटण नगरपरिषदेच्या मलनिस्सारण** प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे :-

**अ) (१) प्रकल्प कार्यान्वयन यंत्रणा** :-

- सदर प्रकल्पाचे कार्यान्वयन फलटण नगरपरिषदेमार्फत करणेत यावे.
- सदर प्रकल्पास मान्यता देताना राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीने विहित केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

**(२) प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार:-**

- सदर प्रकल्पास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC) म्हणून नियुक्त करणे बंधनकारक राहील. त्याबाबतचा आवश्यक ठराव नगरपरिषदेने करावा.
- प्रकल्प किंमतीच्या ३% इतके प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार शुल्क (PMC Charges) नगरपरिषदेने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास प्रदान करावे.

**ब) सुधारणांची पूर्तता:-**

- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खाली दर्शविलेल्या बंधनकारक व वैकल्पीक सुधारणा (रिफॉर्म) पूर्ण करणे आवश्यक राहिल. त्यापैकी ८० टक्के वैकल्पिक अटींची पूर्तता प्रकल्पाच्या दुसऱ्या वर्षापर्यंत करणे आवश्यक राहील.

I) **बंधनकारक सुधारणा:-**

- प्रकल्प मंजुरीच्या पहिल्या वर्षात नगरपरिषदेने त्यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यु नोंद सुधारणा याची १०० टक्के अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.

- उचित उपभोक्ता कर लागू करुन किमान ८० टक्के वसुली करणे.
- नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.
- संबंधित स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेने, द्विलेखा नोंद पद्धती सहा महिन्यात पूर्ण करणे आवश्यक राहिल.
- संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रातील मालमत्ता कराचे पुर्नमुल्यांकन झाले नसल्यास, प्रकल्प मंजूरीपासून पुढील एक वर्षाच्या कालावधीत ते पूर्ण करणे बंधनकारक राहिल.
- संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने "घनकचरा व्यवस्थापन नियम २०१६"च्या तरतूदीनुसार त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन उचित रित्या करणे बंधनकारक राहील.
- संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील मालमत्ता कराची व पाणीपट्टीची वसुली पहिल्या वर्षी किमान ८० टक्के करणे बंधनकारक राहील. त्यापुढील वर्षात सदरहू वसूली उर्वरीत ९० टक्के या प्रमाणात करणे आवश्यक राहील.

II) **<u>वैकल्पिक सुधारणा:-</u>**

- मलनिस्सारण प्रकल्प हाती घेतलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी नागरी भागातील सांडपाण्याचे पुर्नप्रक्रिया व पुर्नवापर करण्याबाबतच्या घटकांचा समावेश त्यांच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये करावा.
- संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या मालकीच्या इमारतीवर पर्जन्यजल संचय करावे.
- संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने नियमितपणे जल लेखापरिक्षण (वॉटर ऑडीट) करुन घ्यावे. जल लेखापरिक्षण अहवालात नमूद त्रूटींचे निराकरण करण्याबाबत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, त्यासंदर्भात आवश्यक कृती कार्यक्रम तयार करुन विहित कालावधीत त्रूटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

क) **<u>निधी वितरणाची कार्यपद्धती:-</u>**

- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी यापुढे राज्य शासनाचा अनुज्ञेय हिस्सा तीन हप्त्यात (प्रत्येकी ३३.३ टक्के) वितरीत करण्यात येईल.
- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पांसाठी प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर संबंधित नागरी स्वराज्य संस्थेने प्रकल्पाचा आर्थिक आराखडा (Financial Closure Report) नगर विकास विभागास सादर करावा. त्यानंतरच सदर प्रकल्पासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.
- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत मंजूर प्रकल्पास पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत केल्यानंतर तो हप्ता व स्थानिक स्वराज्य संस्थेचा त्याप्रमाणातील स्वहिस्सा हा एकत्र निधी, शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहित केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.
- राज्य शासनाने वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याच्या अनुदानाची रक्कम व त्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने जमा केलेली पहिल्या हप्त्याची स्वहिश्याची रक्कम अशा

एकत्रित रकमेच्या ७० टक्के खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र, नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर केल्यानंतरच राज्य शासनाचा दुसरा हप्ता वितरीत केला जाईल.

- **तथापि तत्पूर्वी संबंधित नगरपरिषद १०० टक्के हागणदारी मुक्त करून घोषित करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेस बंधनकारक राहील**.
- नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी दुसऱ्या हप्त्याची मागणी करताना प्रस्ताव नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत शासनास सादर करावा. नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी प्रस्तावांची छाननी करून उचित अभिप्रायांसह शासनास प्रस्ताव द्यावा.

ड) <u>निविदा प्रक्रिया, कार्यादेश व कार्यान्वयन :-</u>

- या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत केल्यानंतर एक महिन्याच्या कालावधीत निविदा काढणे व तीन महिन्याच्या कालावधीत कार्यादेश देणे व १०१ व्या दिवसापूर्वी कामाचा प्रत्यक्ष प्रारंभ करणे बंधनकारक राहील.
- सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया राबविताना संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन निर्णयातील सूचनाचे तंतोतंत पालन करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.
- यानुसार कार्यवाही न झाल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी त्यावरील व्याजासह शासनास परत करणे आवश्यक राहील.
- सदर प्रकल्पासाठी विहित केलेल्या कार्यमर्यादेत प्रकल्पाचे काम पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.
- सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश दिल्यानंतर प्रकल्पामध्ये समाविष्ट असलेल्या पाईप्स इत्यादी वस्तुंची खरेदी ही प्रकल्पाच्या आवश्यकतेनुसार प्रकल्प व्यवस्थापन यंत्रणेच्या मार्गदर्शनाने करावी.
- सदर प्रकल्पासाठी सुरवातीला अनावश्यक स्वरुपात **पाईप्सची खरेदी करणे व त्यासाठी प्रकल्प निधीतून प्रदान करणे ही गंभीर स्वरुपाची वित्तिय अनियमितता** समजण्यात येईल व त्यासाठी **संबंधित कार्यान्वयन यंत्रणा व प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार यंत्रणेस जबाबदार** धरण्यात येईल.
- या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पास राज्यशासनाने संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेस राज्यशासनाचा हिस्सा मंजूर केल्यानंतर त्यामधून खर्च करताना प्रत्येक टप्प्यावर प्रत्येक देयकामध्ये राज्यशासनाच्या हिश्श्यामधून जेवढी रक्कम प्रदान होणार असेल त्याप्रमाणात संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने स्वहिश्श्याची रक्कम प्रदान करावी. यामुळे अशा योजनेत स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा एकाच वेळी भरण्याची वेळ येणार नाही.
- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी राज्य शासनाने मंजूर केलेला निधी फक्त त्याच प्रकल्पासाठी वापरता येईल व ते अन्य कोणत्याही कामासाठी वळवता किंवा वापरता येणार नाही. अशाप्रकारे मूळ निधी किंवा त्यावरील व्याज कायम स्वरुपी किंवा तात्पुरत्या स्वरुपात अन्यत्र वळविणे ही गंभीर स्वरुपाची

आर्थिक अनियमितता मानली जाईल, त्यासाठी संबधित स्थानिक स्वराज्य संस्था/संबधित अधिकारी कारवाईस पात्र ठरतील.

**इ)** **प्रकल्पांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण:-**

- महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासकीय/निमशासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयाकडून "त्रयस्थ तांत्रिक परिक्षण" (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, स्वनिधीतून करुन घेणे बंधनकारक राहिल.तसेच प्रकल्पांतर्गत दुसरा हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे" गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. तद्‌नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

**फ)** **प्रकल्पासाठी आवश्यक स्वहिश्याचा निधी भरण्याकरिता कर्ज उभारणी:-**

- महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत"मंजूर प्रकल्पांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांचा स्वहिश्याचा निधी उभारण्यासाठी "राष्ट्रीयीकृत बँकांकडून" तसेच "हुडको"(HUDCO), "मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण" (एमएमआरडीए), "महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादीत" (एमयुआयडीसीएल) व शासनमान्य वित्तिय संस्थांकडून कर्ज घेण्याची मुभा राहील.
- तथापि वित्तिय संस्थांकडून कर्ज घेताना त्यासंदर्भात आवश्यक त्या बाबींची पूर्तता केल्यानंतर प्रचलित नियमांच्या अधीन राहून कर्ज घेण्याबाबत शासनाची परवानगी घेण्यात येईल. तसेच शासनाच्या विहित प्रचलित नियमांच्या अधीन राहून आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहिल.

**ग)** **प्रकल्पाची देखभाल व दुरूस्ती:-**

- महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीबाबत आवश्यक ते नियोजन संबंधित कार्यान्वयन यंत्रणेमार्फत करण्यात यावे, जेणेकरुन सदर प्रकल्पांतून होणारी फलनिष्पत्ती ही शाश्वत राहील.
- सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

**ह)** **इतर अटी व शर्ती :-**

- राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित **नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची** राहील.
- राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.
- संदर्भाधीन क्र. १ ते ३ या शासन निर्णयातील तरतुदी तसेच सर्व अटी व शर्तींची पूर्तता करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३३०११३२२८४३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.04.07 12:45:14 +05'30'

**(पां.जो.जाधव)**

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, पाणी पुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक, गो. ते. रुग्णालय, मुंबई.
६. प्रधान सचिव,नगरविकास विभाग(२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, एम.यु.आय.डी.सी.एल, मुंबई.
८. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त,पुणे.
११. जिल्हाधिकारी, सातारा.
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, सातारा.
१३. मुख्याधिकारी, फलटण नगरपरिषद, फलटण.
१४. निवडनस्ती, नवि-३३.